राष्ट्रीय कृषि विकास योजना - रफ्तार योजनेंतर्गत सन २०२१-२२ मध्ये अनुसूचित जमाती प्रवर्गाचा ₹२१.११ कोटी निधी वितरीत करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: राकृवि २०२२ /प्र.क्र. ६९(भाग-२)/१४-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २३ मार्च, २०२२

**संदर्भ :**

१. वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३ दि.०३ फेब्रुवारी, २०२२.
२. कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभाग, केंद्रीय कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. ५-१/२०२१- आरकेव्हीवाय दि. ०४ मे, २०२१.
३. राज्य स्तरीय प्रकल्प मंजुरी समितीच्या (SLSC) २९ व्या बैठकीचे इतिवृत्त क्र. आरकेव्ही-०१२०/ प्र.क्र.१४/१४-अे दि. ०५ जुलै, २०२१
४. कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभाग, केंद्रीय कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. १-१५/२०२१ आरकेव्हीवाय/३ दि. ०८ मार्च, २०२२.
५. आदिवासी विकास विभागाचा शासन निर्णय क्र. बीयुडी-२०२१/प्र.क्र.७/कार्यासन-६ दि. २२ मार्च, २०२२

**प्रस्तावना :**

राष्ट्रीय कृषि विकास योजना - रफ्तार ही योजना केंद्र व राज्य शासनाच्या अनुक्रमे ६०:४० प्रमाणात अर्थसहाय्याने राबविण्यात येत असून या योजनेंतर्गत सन २०२१-२२ मध्ये अनुसूचित जमाती प्रवर्गाकरिता केंद्र शासनाने संदर्भाधीन दि. ०८ मार्च, २०२२ रोजीच्या पत्रान्वये राज्यास अनुसूचित जमाती प्रवर्गाकरिता केंद्र हिस्याचा ₹ १२.६७ कोटी निधी वितरीत केला आहे. त्यानुसार केंद्र हिश्श्याचा ₹ १२.६७ कोटी निधी व त्या समरुप राज्य हिस्याचा ₹ ८.४४ कोटी निधी असा एकूण ₹२१.११ कोटी निधी वितरणासाठी उपलब्ध असून तो निधी आयुक्त (कृषि) यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यानुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णयः**

**१.** या शासन निर्णयान्वये सन २०२१-२२ मध्ये राष्ट्रीय कृषि विकास योजना - रफ्तार या योजनेंतर्गत मंजूर प्रकल्पांच्या अंमलबजावणीसाठी अनुसूचित जमाती प्रवर्गाकरिता केंद्र व राज्याच्या ६०:४० अर्थसहाय्याच्या प्रमाणात एकूण ₹२१.११ कोटी निधी (रुपये एकवीस कोटी अकरा लाख फक्त) आयुक्त (कृषि) यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे पुढीलप्रमाणे उपलब्ध करुन देण्यात येत आहे

**(रक्कम ₹ कोटी)**

| अ.क्र. | योजनेचे नाव | अनुसूचित जमाती प्रवर्गाकरिता मंजूर निधी (६०:४०) | | |
|---|---|---|---|---|
| | | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | एकूण |
| १. | राष्ट्रीय कृषि विकास योजना - रफ्तार - सर्वसाधारण राकृवियो (Normal RKVY) | १२.६७ | ८.४४ | २१.११ |

**२.** परिच्छेद क्र. १ मध्ये नमूद केल्यानुसार, राष्ट्रीय कृषि विकास योजना - रफ्तार या योजनेंतर्गत केंद्र हिस्याचा ₹ १२.६७ कोटी (रुपये बारा कोटी सदुसष्ठ लाख फक्त) आणि राज्य हिस्स्याचा ₹ ८.४४ कोटी (रुपये आठ कोटी चव्वेचाळीस लाख फक्त) असा एकूण ₹ २१.११ कोटी (रुपये एकवीस कोटी अकरा लाख फक्त) निधी उपलब्ध करुन दिला असून तो योजनेच्या केंद्र व राज्य हिस्स्याच्या पुढील लेखाशिर्षांतर्गत सन २०२१-२२ मध्ये अर्थसंकल्पीत केलेल्या तरतुदीतून खर्ची टाकावा :

| प्रवर्ग | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा |
|---|---|---|
| **अनुसूचित जमाती** | मागणी क्रमांक टी -५<br>२४०१- पीक संवर्धन<br>७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना<br>०१- जनजाती क्षेत्र उपयोजना<br>(०१) (३२) कृषि उन्नती योजना - राष्ट्रीय कृषि विकास योजना अंतर्गत अर्थसहाय्य<br>(केंद्र हिस्सा ६० टक्के) (कार्यक्रम)<br>(२४०१ A७४४) ३३-अर्थसहाय्य | मागणी क्रमांक टी -५<br>२४०१- पीक संवर्धन<br>७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना<br>०१- जनजाती क्षेत्र उपयोजना<br>(०१) (३३) कृषि उन्नती योजना - राष्ट्रीय कृषि विकास योजना अंतर्गत अर्थसहाय्य<br>(राज्य हिस्सा ४० टक्के) (कार्यक्रम)<br>(२४०१A७५३) ३३-अर्थसहाय्य |

**३.** या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेल्या ₹ २१.११ कोटी रक्कमेचे कोषागारातून आहरण व वितरण करण्याकरिता सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी व आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

**४.** सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे यांनी वितरीत केलेला ₹२१.११ कोटी निधी कोषागारातून आहरित करुन आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या नावे उघडण्यात आलेल्या Single Nodal Account (SNA) मध्ये जमा करावा आणि तद्नंतर सदर निधी संबंधित प्रकल्पांच्या अंमलबजावणीसाठी विविध अंमलबजावणी यंत्रणांना वर्ग करावा.

**५.** या शासन निर्णयान्वये राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत अनुसूचित जमाती प्रवर्गाकरिता वितरीत करण्यात येत असलेल्या निधीचे प्रकल्पनिहाय वितरण यथावकाश कळविण्यात येईल.

**६.** उपरोक्त मंजूर निधीचे तात्काळ उपयोजन होण्याच्या दृष्टीनेच कोषागरातून आहरण करावे आणि सर्व विभागांनी त्यांना प्राप्त होणाऱ्या निधीचा तात्काळ विनियोग करावा तसेच अंमलबजावणी यंत्रणांनी निधी उपयोजनाविना बँक खात्यामध्ये जमा करुन ठेवू नये.

**७.** राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत सन २००७-०८ पासून सन २०२०-२१ पर्यंत विविध विभागांना वितरीत केलेल्या निधीचे लेखापरीक्षण होऊन तसे प्रमाणित केल्यानंतर सदर योजनेंतर्गत उर्वरीत निधी दुसऱ्या

टप्प्यामध्ये केंद्र शासनाकडून वितरीत करण्यात येणार आहे, त्यामुळे सर्व अंमलबजावणी यंत्रणांनी/ विभागांनी त्यांना सन २००७-०८ ते सन २०२०-२१ या कालावधीत वितरीत केलेल्या निधीचे सनदी लेखापालांकडून लेखापरिक्षण झाल्याचे प्रमाणित करावे.

८. या शासन निर्णयान्वये केवळ -अनुसूचित जमाती प्रवर्गाकरिता॰ निधी वितरीत करण्यात आला असून सर्व विभागांनी / अंमलबजावणी यंत्रणांनी त्यांना मंजूर केलेल्या प्रकल्पांतर्गत अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी आवश्यक असलेल्या निधीकरिता उपरोक्त रकमेचा विनियोग करावा.

९. वैयक्तिक लाभाच्या प्रकल्पांतर्गत सर्व विभागांनी / अंमलबजावणी यंत्रणांनी लाभार्थ्यांच्या आधार संलग्न बँक खात्यावर थेट लाभ हस्तांतरणाद्वारे (DBT) अनुदान वितरीत करावे.

**१०.** हा शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. ०३ फेब्रुवारी, २०२२ नुसार विहीत केलेल्या अटींची पुर्तता होत असल्याने व आदिवासी विकास विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३२३१२५५१०६८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

SHRIKANT C ANDGE

Digitally signed by SHRIKANT C ANDGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPT., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, pseudonym=1CC019CBB7F0A77E397F15793DF809A69806ED98, serialNumber=D8D9626C9E038380CD235C048F20D7CE74CFFD3A95F2AC3C192E9C991F358271, cn=SHRIKANT C ANDGE
Date: 2022.03.24 12:26:13 +05'30'

**(श्रीकांत आंडगे)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:**

१. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
२. अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई,
३. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
४. प्रधान सचिव (पदुम व पणन), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
५. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. प्रधान सचिव (आदिवासी विकास विभाग), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
८. संचालक (प्रक्रिया व नियोजन), कृषि आयुक्तालय, पुणे,
९. महालेखाकार (स्थानिक निकाय लेखा परिक्षा व लेखा), मुंबई,
१०. प्रधान महालेखापाल - १/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
११. प्रधान महालेखापाल - १/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
१२. सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे,
१३. वित्त विभाग (कार्या. व्यय-१ / अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई,
१४. आदिवासी विकास विभाग (कार्या. ०९/कार्या.०६), मंत्रालय, मुंबई,
१५. मा. मंत्री (कृषि ) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,
१६. निवड नस्ती (१४-अे).